पंचायत समिती देवणी (जि.लातूर) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

## महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः पंसई-२०१९/प्र.क्र.९३/बांधकाम-४
५ वा मजला, मर्झबान पथ, २५ बांधकाम भवन,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
तारीख : ०६ जानेवारी, २०२०

**वाचा :-**

१) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.पंसई-२०११/ प्र.क्र.५२/पंरा-७, दिनांक ६ मे, २०११.
२) **शासन निर्णय क्रमांकः** ग्राम विकास विभाग क्र.पंसई-२०१४/प्र.क्र.१३५/पंरा-७, दिनांक २२ जुलै, २०१४.
३) **अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांचे पत्र क्रमांकः** जिपला/बांध/कार्या-०१/कावि-३१२/१९, दिनांक १० जून, २०१९.
४) **शासन परिपत्रक क्रमांक :** ग्राम विकास विभाग क्र.योजना-२०१९/प्र.क्र.१३६/ बांध-४, दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी वाचा मधील अनुक्रमांक ३ येथील पत्रान्वये देवणी पंचायत समितीच्या (जि.लातूर) प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांस प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती केली आहे.

०२. उक्त वाचा मधील अनुक्रमांक २ येथील दिनांक २२ जुलै, २०१४ रोजीच्या शासन निर्णयान्वये, देवणी पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारत बांधकामाच्या मुळ प्रशासकीय रकमेमध्ये वाढ करून रू.२१३.५१ लक्ष इतक्या रक्कमेची सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. देवणी पंचायत समितीच्या नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम अंतिमत: पुर्ण होण्यासाठी फर्निचर व इतर सुविधांची आवश्यकता आहे. याकरीता अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी फर्निचर व इतर उपकामांकरिता रू.१,३६,२२,०००/- इतक्या रक्कमेचे अंदाजपत्रक सादर केले आहे. सदर अंदाजपत्रक सन २०१८-१९ च्या दरसूचीवर आधारित असून ते अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, उस्मानाबाद व कार्यकारी अभियंता (बां.), जिल्हा परिषद, लातूर यांनी साक्षांकीत केले आहे.

०३. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर यांनी सादर केलेल्या प्रस्तावाच्या तांत्रिक छाननी अंती, देवणी पंचायत समितीच्या (जि.लातूर) नवीन प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या रूपये १३६.२२ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

देवणी पंचायत समिती (जि.लातूर) प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या एकूण रुपये १,३६,२२,०००/-(रूपये एक कोटी छत्तीस लक्ष बावीस हजार फक्त) इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या कामांस पुढील अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

१) पंचायत समिती देवणी (जि.लातूर), प्रशासकीय इमारतीकरिता शासन निर्णय, सा.बां.वि.क्र.सीएटी-१०९६/प्र.क्र.१७२/इमारती-२, दि.७.१.२००४ नुसार विहीत केलेल्या नोंदणीकृत फर्निचर/मॉड्युलर फर्निचर उत्पादक अथवा पुरवठादार/अंतर्गत सजावटकार यांच्याकडून विहीत कार्यपध्दती अनुसरुन फर्निचरचे काम करून घेणे बंधनकारक राहील.

२) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रशासकीय मान्यता किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

३) या कामी प्रशासकीय मान्यता किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/जिल्हा परिषदेने सोसावा.

४) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त एका वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जिल्हा परिषद यांनी नियोजन करावे.

५) प्रस्तुत कामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जिल्हा परिषद यांनी दक्षता घ्यावी.

०२. पंचायत समिती देवणी (जि.लातूर) च्या प्रशासकीय इमारतीकरिता फर्निचर व इतर उपकामांच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढील प्रमाणे आहे.

| **General Abstract for Furniture Works and Sub Works to P. S. Office Administrative Building At Deoni, Dist. Latur** | | |
|---|---|---|
| **Sr.No.** | **Description of item** | **Cost In Rs.** |
| 1 | Furniture Works | 6151760.00 |
| 2 | Fire Fighting arrangement | 200000.00 |
| 3 | Internal Roads | 2500000.00 |
| 4 | Parking | 600000.00 |
| 5 | Intercom, Lan, Internet System | 300000.00 |
| 6 | External Toilets | 414000.00 |
| 7 | AB Room, Area Lighting, Pumps, Generator | 500000.00 |
| 8 | CCTV | 500000.00 |
| 9 | G.S.T. 12 % on P | 1339891.00 |
| 10 | Price Escalation 10 % on P | 1116576.00 |
| | **Total** | 13622227.00 |
| | **Says Rs.** | **1,36,22,000/-** |

०३. उपरोक्त उपकामांसाठी वाचा मधील अनुक्रमांक ४ येथील दिनांक १८ नोव्हेंबर, २०१९ रोजीच्या परिपत्रकानुसार निधीची मागणी Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे करण्यात यावी व सदर परिपत्रकातील निर्देशानुसार, निधीच्या उपलब्धतेनुसार Liability Register System (LRS) प्रणालीद्वारे निधी वितरीत करण्यात येईल. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५ ००५३)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

०४. प्रस्तुत कामाची माहिती कंस्ट्रक्शन ट्रॅकर प्रणालीवर अद्ययावत करावी.

०५. प्रस्तुतचा शासन निर्णय वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका,१९७८ भाग पहिला, उप विभाग-पाच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००१०४१७१३२२८१२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA NATHA SAVANE

Digitally signed by RAJENDRA NATHA SAVANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=0a2ac5ab6ca0075cc776c90ec03925f2eb8727640eacf311beb6f68d63939303, postalCode=400032, street=MANTRALAYA , MUMBAI, serialNumber=f049989dbbef93340e9edd88af960a0963746d42baa5c948405b62e821529a99, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=RAJENDRA NATHA SAVANE
Date: 2020.01.06 12:47:11 +05'30'

**(रा. ना. सवने)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद.
२) मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
५) प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) विभागीय आयुक्त कार्यालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
८) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
९) मुख्य अभियंता, प्र.मं.ग्रा.स.यो., मध्यवर्ती इमारत, पुणे.
१०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
११) अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
१२) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद, लातूर.
१३) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद, लातूर.

१४) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा लातूर.
१५) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१६) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
१७) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, लातूर.
१८) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, देवणी, जि. लातूर.
१९) निवडनस्ती, कार्यासन बांधकाम-४, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.